**भारतीय राष्ट्रीय महामार्ग प्राधिकरणाकडे भूसंपादनाकरिता ११ विशेष भूसंपादन अधिकारी असलेल्या पथकांची पूर्णवेळ सेवा उपलब्ध करुन देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: संकीर्ण -२०१६/प्र.क्र.२२/अ-४**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-३२
तारीख: १८ जानेवारी, २०१७.

**प्रस्तावना -**

महाराष्ट्रात भूतल परिवहन मंत्रालय/राष्ट्रीय महामार्ग प्राधिकरणाकडून सुमारे २२००० हजार कि.मी. राष्ट्रीय महामार्गांना मंजूरी देण्यात आली आहे. सदर महामार्गांची कामे वेळेवर पूर्ण होण्यासाठी जमीनीचे भूसंपादन ही महत्वाची बाब आहे. संबंधित जिल्ह्यातील राष्ट्रीय महामार्गाच्या भूसंपादनाची कामे त्या-त्या जिल्ह्यात उपलब्ध असलेल्या विशेष भूसंपादन अधिकारी/उपजिल्हाधिकारी यांचेकडून त्यांचेकडे असलेली राज्य शासनाची कामे सांभाळून केली जातात. त्यामुळे राष्ट्रीय महामार्गाच्या भूसंपादनाचे कामाला अपेक्षित गती येत नाही. पर्यायाने सदर प्रकल्पांच्या भूसंपादनाचे काम विहीत मुदतीत पूर्ण होत नाही. यास्तव भूसंपादनाची कामे जलदगतीने पूर्ण होण्यासाठी कर्नाटक राज्याच्या धर्तीवर महाराष्ट्र शासनाच्या आस्थापनेवरील उपजिल्हाधिकारी दर्जाची विशेष भूसंपादन अधिकारी असलेली पथके यांच्या पूर्णवेळ सेवा भारतीय राष्ट्रीय महामार्ग प्राधिकरणाकडे राष्ट्रीय महामार्गांच्या भूसंपादनाच्या कामासाठी वर्ग करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती. त्याबाबत सर्वंकष विचारविनिमय करुन शासन खालील प्रमाणे निर्णय घेत आहे:-

**शासन निर्णय -**

महाराष्ट्रातील राष्ट्रीय महामार्गाच्या भूसंपादनाची कामे वेळेत व वेगाने पूर्ण होण्यासाठी शासनाच्या आस्थापनेवरील खालील विशेष भूसंपादन अधिकारी असलेली एकूण ११ पथके भारतीय राष्ट्रीय महामार्ग प्राधिकरणाकडे सोबत परिशिष्ट अ मध्ये नमूद केलेल्या अटी व शर्तीस अधिन राहून वर्ग करण्यात येत आहेत.

| अ.क्र. | NHAI साठी प्रस्तावित भूसंपादन अधिकाऱ्याचे नाव व पथकाचे नाव | प्रस्तावित पथक NHAI च्या प्रकल्पांचे भूसंपादनाचे काम करेल त्या ठिकाणाचे नाव |
|---|---|---|
| १. | उपजिल्हाधिकारी भूसंपादन क्र.३ पुणे. | पुणे |
| २. | उपजिल्हाधिकारी भूसंपादन क्र.११ सोलापूर | सोलापूर |
| ३. | उपजिल्हाधिकारी भूसंपादन मेट्रोसेंटर क्र.१ पनवेल | पनवेल जि.रायगड |
| ४. | विशेष भूसंपादन अधिकारी क्र.६ कोल्हापूर. | कोल्हापूर |
| ५. | उप जिल्हाधिकारी, भूसंपादन, क्र.२, नाशिक. | नाशिक |
| ६. | उप जिल्हाधिकारी, भूसंपादन, वि.पा.वि.म., क्र.२, नागपूर तथा भूसंपादन शाखा, नागपूर. | नागपूर |

| | | |
|---|---|---|
| ७. | उप जिल्हाधिकारी, भूसंपादन, रस्ते प्रकल्प, यवतमाळ. | यवतमाळ |
| ८. | उप जिल्हाधिकारी, पाझरतलाव, लघुसिंचन कामे-२ नांदेड. | नांदेड |
| ९. | उप जिल्हाधिकारी, भूसंपादन, अ.व.प्र.क्र.-४, अमरावती. | अमरावती |
| १०. | उप जिल्हाधिकारी, भूसंपादन, मपाप्र, धुळे. | धुळे |
| ११. | विशेष भूसंपादन अधिकारी, कृष्णा खोरे विकास महामंडळ, औरंगाबाद. | औरंगाबाद |

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०११८१७५२५५१९१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Subhash K Gawade

Digitally signed by Subhash K Gawade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=40b8b2876e2135f5b158b877f59754b2a7ddf64e0cf59f2dc33ad60b8bce5bcd, cn=Subhash K Gawade
Date: 2017.01.18 17:57:20 +05'30'

(सु.कि.गावडे)
सहसचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२. मा.मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव
३. मा.राज्यमंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव
४. भारतीय राष्ट्रीय महामार्ग प्राधिकरण,मुख्य कार्यालय, जी.५ व ६, सेक्टर १०, द्वारका, नवी दिल्ली-७५
५. भारतीय राष्ट्रीय महामार्ग प्राधिकरण, प्रादेशिक अधिकारी, मुंबई प्रादेशिक कार्यालय, ४ था मजला, एमटीएनएल टीई बिल्डींग, सेक्टर-११, सीबीडी, बेलापूर (ई), नवी मुंबई-४००६१४.
६. भारतीय राष्ट्रीय महामार्ग प्राधिकरण, प्रादेशिक अधिकारी, नागपूर प्रादेशिक कार्यालय, प्लॉट नं.१५९, बंगला नं.१, शुंभकर अपार्टमेंट, रामनगर, अंबाझरी हील टॉप, नागपूर-४४००३३.
७. अधिक्षक अभियंता, महाराष्ट्र आणि गोवा, रस्ते वाहतूक व महामार्ग मंत्रालय, एमटीएनएल, टीई बिल्डींग, सेक्टर-११, सीबीडी, बेलापूर (ई), नवी मुंबई-४००६१४.
८. प्रधान सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग
९. अप्पर मुख्य सचिव, वित्त विभाग
१०.सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/ सचिव मंत्रालय, मुंबई
११.सर्व विभागीय आयुक्त
१२.सर्व जिल्हाधिकारी
१३. कार्यासन - अ-१, अ-२ , अ-३ व ई-२
१४.निवडनस्ती- अ-४.

**परिशिष्ट 'अ'**

(शासन निर्णय महसूल व वन विभाग (भूसंपादन शाखा) क्र.संकीर्ण-२०१६/प्र.क्र.२२/अ-४, दि.१८/०१/२०१७ चे सहपत्र)

महाराष्ट्रातील राष्ट्रीय महामार्गाच्या भूसंपादनाची कामे वेळेत व वेगाने पूर्ण होण्यासाठी शासनाच्या आस्थापनेवरील विशेष भूसंपादन अधिकारी असलेली एकूण ११ पथके भारतीय राष्ट्रीय महामार्ग प्राधिकरणाकडे खाली नमूद केलेल्या अटी व शर्तीस अधिन राहून वर्ग करण्यात येत आहेत.

१. विशेष भूसंपादन अधिकारी व त्यांचे अधिपत्याखाली असलेले सर्व कर्मचारी वृंद असे पूर्ण युनिट वर्ग करावे. सदर युनिटच्या वेतन व भत्त्यापोटीचा निधी भारतीय राष्ट्रीय राजमार्ग प्राधिकरणाकडून संबंधित जिल्हाधिकारी यांचेकडे वर्ग करण्यात यावा. सदर युनिटचे वेतन व भत्ते संबंधित जिल्हाधिकारी कार्यालयाकडूनच अदा करण्यात येतील.

२. संबंधित भूसंपादित युनिट सध्या कार्यरत असणाऱ्या अधिकारी व कर्मचाऱ्यांसहित हस्तांतरीत करावयाचे आहे. वर्ग करावयाच्या युनिटमध्ये कर्मचाऱ्यांच्या काही रिक्त जागा असल्यास त्या त्वरित भरण्याची कार्यवाही संबंधित जिल्हाधिकारी यांनी करावी.

३. या शिवाय अधिक मनुष्यबळ आवश्यक असल्यास, ते कंत्राटी पध्दतीने NHAI ने पुरवून त्यासाठी होणारा खर्च राष्ट्रीय महामार्ग प्राधिकरणाने उपलब्ध करुन देणे आवश्यक राहील.

४. राज्य शासनाचे सदर भूसंपादन अधिकारी/ कर्मचारी हे संबंधित प्रादेशिक अधिकारी, भारतीय राष्ट्रीय राजमार्ग प्राधिकरण यांचे नियंत्रणाखाली राहतील. सदर पथक हे NHAI च्या कार्यालयात बसून कामकाज करेल व त्यासाठी लागणारी कार्यालयीन जागा, संगणक, कार्यालयीन साहित्य, फर्निचर व वाहन व प्रवास खर्च, प्रशिक्षण खर्च इत्यादी खर्च प्राधिकरणाने करावा.

५. सदर भूसंपादन अधिकारी/कर्मचारी फक्त राष्ट्रीय महामार्गाचे भूसंपादनाचे काम पाहतील. त्यांना इतर कोणतीही जबाबदारी देण्यात येणार नाही.

६. संबंधित अधिकारी व कर्मचारी हे प्रादेशिक अधिकारी, राष्ट्रीय महामार्ग प्राधिकरण यांचेकडून नेमून दिलेल्या जिल्ह्यातील भूसंपादनाचे काम पाहतील.

७. सदरहू पथके वर्ग केल्यानंतर जिल्ह्यातील त्या पथकाकडील भूसंपादनाची कामे/इतर कामकाज अन्य विशेष भूसंपादनअधिकारी/उपविभागीय अधिकारी यांना वाटप करणेबाबत संबंधित जिल्हाधिकारी यांनी तात्काळ कार्यवाही करावी.

८. सदरहू पथकांचा कालावधी हा भारतीय राष्ट्रीय महामार्ग प्राधिकरणाच्या संबंधित प्रकल्पाचे भूसंपादनाचे काम पूर्ण होईपर्यंतच राहील. काम पूर्ण झाल्यानंतर संबंधित पथक संबंधित जिल्हाधिकारी कार्यालयाकडे वर्ग होईल.

९. संबधित सर्व अधिकारी व कर्मचारी यांचे गोपनीय अहवाल व रजा व सेवा पुस्तके इत्यादी सेवा विषयक सर्व बाबींचे कामकाज संबंधित जिल्हाधिकारी यांचे कडे विहीत वेळेत पाठवण्याची जबाबदारी संबंधित प्रादेशिक अधिकारी, भारतीय राष्ट्रीय महामार्ग प्राधिकरण यांची राहील.

१०.संबधित जिल्ह्यातील राष्ट्रीय महामार्ग प्राधिकरणाचे भूसंपादनाचे काम फक्त सदर पथकाकडेच राहील. इतर उर्वरित विशेष भूसंपादन अधिकारी / उप विभागीय अधिकारी यांचेकडे याची जबाबदारी राहणार नाही. इतरांकडे अशी कामे असल्यास जिल्हाधिकारी यांनी सदर पथकाकडेच सदर कामे सोपविण्याची कार्यवाही करावी.

********************************